केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग, सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) व <u>Nodal Officer यांची नियुक्ती करण्याबाबत</u>
स्मार्ट सिटी अभियान

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- स्मार्टसि-२०२२/प्र.क्र.९३/नवि-३३**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- २९ मार्च, २०२२**

**वाचा : -**

१. भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.No.१(१३)PFMS/FCD/२०२०, दिनांक २३ मार्च, २०२१
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक ०१ जुलै, २०२१
३. भारत सरकार, वित्त, मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.१(०२)/PFMS/FCD/२०२२, दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२२
४. भारत सरकार, गृहनिर्माण व नागरी विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. K-१५०१६/९२/२०१९-SC-I-US-II, दिनांक १६ फेब्रुवारी, २०२२

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधिन दिनांक २३ मार्च, २०२१ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये सुधारीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) बाबत सुधारीत सूचना दिलेल्या आहेत. संदर्भ क्रमांक ३ कार्यालयीन ज्ञापनान्वये तसेच संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रत्येक स्मार्ट सिटी करीता स्वतंत्र Single Nodal Agency (SNA) ची नियुक्ती करण्याचे निर्देश राज्य शासनास देण्यात आलेले आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एक Single Nodal Agency (SNA)ची नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Bank Account उघडणे आवश्यक आहे. तसेच सदर केंद्र पुरस्कृत योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान सह सचिव / उप सचिव दर्जाच्या Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुसार नगरविकास विभागांतर्गत स्मार्ट सिटी अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer ची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार नगरविकास विभागांतर्गत चालू असलेल्या / भविष्यात चालू होणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी पुढील प्रमाणे केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक २३ मार्च, २०२१ रोजीच्या कार्यालयीन ज्ञापनान्वये सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) बाबत सुधारीत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एक Single Nodal Agency (SNA) नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Bank Account उघडणे आवश्यक आहे. तसेच सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान सह सचिव / उप सचिव दर्जाच्या Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुसार नगर विकास विभागांतर्गत स्मार्ट सिटी अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता पुढील तक्त्यात दर्शविल्यानुसार Single Nodal Agency (SNA) नियुक्त करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव व संकेतांक क्रमांक | Single Nodal Agency (SNA) |
|---|---|---|
| १ | **स्मार्ट सिटी अभियान**<br>२२१७९९१२ (प्रकल्प निधी) (केंद्र हिस्सा)<br>२२१७९९२१ (प्रकल्प निधी) (राज्य हिस्सा)<br>२२१७अे११८ (कार्यालयीन व प्रशासकिय खर्चाकरीता निधी) (केंद्र हिस्सा)<br>२२१७अे१२७ (कार्यालयीन व प्रशासकिय खर्चाकरीता निधी) (राज्य हिस्सा) | **मुख्य कार्यकारी अधिकारी, पुणे विशेष उद्देश वहन, पुणे** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, सोलापूर विशेष उद्देश वहन, सोलापूर** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, नाशिक विशेष उद्देश वहन, नाशिक** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे विशेष उद्देश वहन, ठाणे** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर विशेष उद्देश वहन, नागपूर** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, कल्याण-डोंबिवली विशेष उद्देश वहन, कल्याण-डोंबिवली** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, औरंगाबाद विशेष उद्देश वहन, औरंगाबाद** |
| | | **मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड विशेष उद्देश वहन, पिंपरी-चिंचवड** |

२. नगर विकास विभागांतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयासाठी सह सचिव / उप सचिव (नगर विकास - नवि ३३) यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

३. स्मार्ट सिटी अभियानांतर्गत वितरीत निधीकरीता सर्व स्मार्ट सिटीजने स्वतंत्र Single Bank Account उघडावे व त्यामध्ये सध्या शिल्लक निधी वर्ग करावा, या अभियानांतर्गत भविष्यात वितरीत होणारा

निधी कोषागारातून आहरीत करणाऱ्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी अशा प्राधिकृत बँकेमधील स्वतंत्र खात्यावर (SNA Account) वर्ग करणे अनिवार्य राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२२०३२९१३०८४१३८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2022.03.29 13:33:51 +05'30'

**(पां. जो. जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, मुंबई.
५. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / नागपूर
११. आयुक्त, महानगरपालिका सर्व.
१२. विभागीय आयुक्त सर्व.
१३. जिल्हाधिकारी सर्व.
१४. सर्व प्रादेशिक उपायुक्त, नगर परिषद प्रशासन
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी पुणे / सोलापूर / नाशिक /ठाणे / नागपूर / कल्याण-डोंबिवली / औरंगाबाद / पिंपरी - चिंचवड विशेष उद्देश वहन

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी :-**

१६. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती, (नवि-३३).